**उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिपत्याखालील स्त्री रुग्णालय, जालना येथील ६ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१७/प्र.क्र.६३/आरोग्य-४**
१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीख: १९ एप्रिल, २०१७.

वाचा

1) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१६/प्र.क्र.३८/आरोग्य-४, दि.२०.१०.२०१६.**
2) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७.**
3) **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५/स्त्रीरु जालना/अपदे-६/सन२०१७-१८/३८२२-२३/१७, दि.१३.०४.२०१७.**

**शासन निर्णय**

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिनस्त स्त्री रुग्णालय, जालना येथील ६ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये दि.१.१०.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या अधिनस्त स्त्री रुग्णालय, जालना येथील ८२ अस्थाई पदांना दि.१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर पदांवरील खर्च सन २०१७-१८ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा- विषम चिकित्सा, ११०- रुग्णालये व दवाखाने, ११०-२- मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने, (०१)(०१)- मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०१४६)" करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१८१३०३४७६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87cfab3c12a61b33987277f837a341fb6c84ebe6d1bf10339d150649af95e5b8, cn=Ashok Tanbaji Uike
Date: 2017.04.19 12:48:10 +05'30'

**अ.ता.उईके**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, जालना.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी,जालना
१०. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).

प्रपत्र अ

स्त्री रुग्णालय, जालना येथील अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव दि.०१.०३.२०१७ ते २८.०२.२०१८

| अ.क्र. | तात्पुरत पद ज्या शासन निर्णयाव्दारे निर्माण केले त्याचा दिनांक | पदनाम | पदांची सेख्या | वेतन श्रेणी | ज्या शासन निर्णयाव्दारे पद दि.१ मार्च२००५ ते २८ फेब्रु ०६ पर्यंत पुढे चालु ठेवण्यात आलेल्याचा शा.नि.क्र. व दि. | ज्या दिनांकापासून पदे पुढे चालु ठेवायचे आहे तो दिनांक | लेखाशिर्ष | पदे पुढे चालु ठेवण्याबाबत समर्थन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | जिरुजा/२४९७/प्रक्र१११/९७/आ-३ दि. २५.०८.९८ | वैद्यकिय अधिकारी वर्ग - २ | २ | १५६०० - ३९१०० ग्रेड पे - ५४०० | १) शानिक्र जिरुजा अपदे-२०१६/प्रक३८// आरोग्य मंत्रालय , मुंबई दि.२५ एप्रिल२०१६ | दि.०१.०३. २०१७ ते २८. ०२.२०१८ | २२१०- वैद्यकिय सेवा व सार्वजनिक- आरोग्य ०१ - नागरी आरोग्य सेवा विषमचिकित्सा ११०-२ मुफसल क्षेत्रातील रुग्णालय व दवाखाने. (०१) (०१) मुफसल क्षेत्रातील अध्यापनतर शासकिय रुग्णालय व दवाखाने ( २२१००१४६) | आरोग्य सुविधा स्त्री व बाल रुग्णांना जास्तीत जास्त प्रमाणात मोफत मिळविण्याच्या दृष्टिने प्रस्तावात दर्शविलेली सर्व पदे पुढे चालु ठेवणे आवश्यक आहे. |
| २ | — // — | अधिपरिचारीका वर्ग - ३ | ३ | ९३०० - ३४८०० ग्रेड पे - ४२०० | — // — | — // — | — // — | — // — |
| ३ | — // — | कक्षसेवक वर्ग - ४ | १ | ४४४० - ७४४० ग्रेड पे - १३०० | — // — | — // — | — // — | — // — |

(डॉ आर.एस.पाटील)
वैद्यकिय अधिक्षक,
जिल्हा स्त्री रुग्णालय जालना